**वन जमाबंदी अधिकारी, सावंतवाडी यांच्या पदनामात बदल करणे तसेच त्यांचे मुख्यालय सावंतवाडी येथून नवी मुंबई येथे स्थलांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१७/प्र.क्र.४००/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १२.०७.२०१७.

**पहा :-**

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग, क्रमांक एफएलडी-२०१३/प्र.क्र.६/फ-३, दिनांक ६.०६.२०१५.
२) शासन निर्णय महसूल व वन विभाग, क्रमांक एस-१०/२०१७/प्र.क्र.९४/फ-३, दिनांक २३.०२.२०१७.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-२७/१ /विवअ/वजअसा/१५६, दिनांक ७.०६.२०१७.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-२७/१ /विवअ/वजअ सा/१५७, दिनांक ७.०६.२०१७.

**प्रस्तावना :-**

वन जमाबंदी अधिकारी यांचे सुधारित कार्यक्षेत्र शासनाने दिनांक ६.०६.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित केले आहे. त्यानुसार वन जमाबंदी अधिकारी, सावंतवाडी यांचेकडे कोंकण महसूल विभागातील सर्व जिल्हे सोपविण्यात आलेले आहेत. कोंकण महसूल विभागात ठाणे, मुंबई, मुंबई उपनगर, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग अशा ७ जिल्ह्यांचा समावेश आहे. सदर ७ जिल्ह्यांपैकी रत्नागिरी व सिंधुदूर्ग जिल्हे वगळता इतर सर्व जिल्हे मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे यांच्या अधिपत्याखाली येतात. वन जमाबंदी अधिकारी, सावंतवाडी यांचे मुख्यालय सावंतवाडी (मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर यांच्या अंतर्गत) येथे असल्यामुळे इतर जिल्हयातील वन जमाबंदीची चौकशी करणे सोईस्कर होत नाही.

वन विभागाकडील पर्यायी / कांदळवन / वनेत्तर क्षेत्राचे राखीव वन म्हणून अधिसूचित करण्याबाबतच्या शासनाच्या नवीन धोरणाचा विचार करता, वन जमाबंदी संबंधी फार मोठया प्रमाणावर कामे करावी लागणार आहेत. त्यामुळे वन जमाबंदी अधिकारी, सावंतवाडी यांच्या कार्यालयाचे स्थलांतर कोंकण भवन, नवी मुंबई येथे केल्यास त्यांना आयुक्त कोंकण व मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे यांचेसोबत यथोचित समन्वय राखून प्रकरणांचा निपटारा जलद गतीने करणे शक्य हाईल.

उपरोक्त परिस्थिती लक्षात घेता, वन जमाबंदी अधिकारी, सावंतवाडी हे पद त्यांचे अधिनस्त असलेल्या इतर अधिकारी / कर्मचारी यांचेसह (मुख्यालय) सावंतवाडी येथून कोंकण भवन, नवी मुंबई येथे स्थलांतरीत करण्याबाबत तथा पर्यायाने त्यांच्या पदनामात बदल करुन वन जमाबंदी अधिकारी, कोंकण करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

<u>शासन निर्णय-:</u>

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने वन जमाबंदी अधिकारी, सावंतवाडी यांचे मुख्यालय सावंतवाडी येथून नवी मुंबई येथे खालील तक्त्यात नमूद केलेल्या पदासह दिनांक १ ऑगस्ट, २०१७ पासून स्थलांतरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | एकूण पदे | स्थायी / अस्थायी |
|---|---|---|---|
| १ | वन जमाबंदी अधिकारी | १ | अस्थायी |
| २ | मंडळ अधिकारी | १ | स्थायी |
| ३ | सर्व्हेअर | १ | स्थायी |
| ४ | वनपाल | १ | अस्थायी |
| ५ | लिपीक | १ | स्थायी |
| ६ | वाहन चालक | १ | स्थायी |
| ७ | अव्वल कारकून | १ | स्थायी |
| ८ | चेनमन | १ | स्थायी |
| ९ | शिपाई | २ | स्थायी |
| | **एकूण पदे** | १० | |

२. वन जमाबंदी अधिकारी कार्यालयात वन विभाग व महसूल विभागाकडून अधिकारी / कर्मचारी यांची पदस्थापना करण्यात येते. सबब, उपरोक्त तपशिलातील मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर यांच्या आस्थापनेवरील कर्मचारी /अधिकारी यांची पदस्थापना मुख्य वनसंरक्षक (प्रा.) ठाणे यांच्या आस्थापनेवर हस्तांतरित करण्यात येत आहे. तसेच उपरोक्त तपशिलातील जिल्हाधिकारी, सिंधुदूर्ग यांच्या आस्थापनेवरील कर्मचारी /अधिकारी यांची पदस्थापना जिल्हाधिकारी, रायगड यांच्या आस्थापनेवर हस्तांतरित करण्यात येत आहे.

३. यातील अस्थायी पदांना संदर्भ क्र. (२) येथील शासन निर्णयानुसार वन क्षेत्राचे सर्वेक्षण, सिमांकन व जमाबंदी या योजनेखालील प्रधान शिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), ०१ वनीकरण, १०१ वनसंधारण विकास व पुनर्निर्मिती (०१) (०२) वनांचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (२४०६ ०१०२) या लेखाशिर्षांतर्गत २० अस्थायी पदांना सन २०१७-१८ या वर्षासाठी मुदतवाढ प्रदान करण्यात आलेली आहे. या पदांमध्ये वनजमाबंदी अधिकारी, सावंतवाडी व त्यांचे कर्मचारी यांच्या पदांचा समावेश आहे.

४. वन जमाबंदी अधिकारी, सावंतवाडी यांच्या पदनामात बदल करुन वन जमाबंदी अधिकारी, कोंकण असे करण्यात येत आहे.

५. वन जमाबंदी, सावंतवाडी यांच्या कार्यालयाच्या स्थलांतरणानंतर त्यांना लागणारी आवश्यक साधनसामुग्री व इतर व्यवस्था करण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे यांनी करावी.

६. शासन निर्णय दिनांक ६.०६.२०१५ अन्वये वन जमाबंदी अधिकारी, सावंतवाडी यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यासाठी प्रतिवेदन अधिकारी मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर व पुनर्विलोकन अधिकारी विभागीय आयुक्त, कोंकण ठरविण्यात आले होते. त्यात बदल करुन वन जमाबंदी अधिकारी, कोंकण यांचे गोपनीय

अहवाल लिहिण्यासाठी प्रतिवेदन अधिकारी मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे (मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर यांच्या सल्लयाने) व पुनर्विलोकन अधिकारी विभागीय आयुक्त, कोंकण असतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७१२१७५११३५६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2017.07.12 17:47:58 +05'30'

( वीरेंद्र तिवारी )
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रति,**

१. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. विभागीय आयुक्त, पुणे / कोंकण.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक, (प्रादेशिक), ठाणे / कोल्हापूर.
६. वनसंरक्षक, कार्यआयोजना वनवृत्त, ठाणे.
७. वनजमाबंदी अधिकारी, भोर / औरंगाबाद / नागपूर / सावंतवाडी / अमरावती.
८. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा) / (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. महालेखापाल-२ (लेखा परिक्षा) / (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०. कोषागार अधिकारी, सावंतवाडी / ठाणे.
११. वित्त विभाग, व्यय-१०, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३. निवडनस्ती, फ-३ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.